राष्ट्रीय कृषि विकास योजनेंतर्गत महाराष्ट्र पशु व मत्स्य विज्ञान विद्यापीठ अंतर्गत क्रांतिसिंह नाना पाटील पशुवैद्यकीय महाविद्यालय, शिरवळ येथे पशुधनामधील वंध्यत्व निर्माण करणाऱ्या आजारांचे औषधोपचाराद्वारे व्यवस्थापन व प्रतिबंध करणे या प्रकल्पास प्रशासकीय मंजूरी प्रदान करणेबाबत

**महाराष्ट्र शासन**
**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः** राकृवि-२०१५/प्र.क्र.४७/पदुम-४
**मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरू चौक,**
**मंत्रालय विस्तार, मुंबई-४०००३२**
**तारीख : ११ मार्च, २०१५**

<u>वाचा :-</u>

१) राकृवियो कक्ष यांचे पत्र क्र.राकृवि-१११४/प्र.क्र.५८/राकृवियो कक्ष, दि. ०७.०१.२०१५ अन्वये दि. ०५.०७.२०१४ रोजी पार पडलेल्या १८ व्या राज्यस्तरीय प्रकल्प मंजुरी समितीच्या बैठकीचे इतिवृत्त.

२) आयुक्त पशुसंवर्धन, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे कार्यालयीन पत्र क्र.एफवायपी-१२(१३)/सीआर- १०५८/२०१४/पसं-०६, पुणे-७, दि.१६.०२.२०१५.

<u>प्रस्तावना :-</u>

पशुधनास होणाऱ्या प्रजोत्पादनासंबंधी विविध आजारांमुळे शेतकरी / पशुपालकानां आर्थिक नुकसान सहन करावे लागते. पशुधनामधील प्रजोत्पादन योग्य वेळी व व्यवस्थीत होत नसल्याने अशा पशुधनापासुन उत्पादन मिळणार नाही. पशुधनामधील वंध्यत्वाची अनेक कारणे असून ही एक मोठी समस्या आहे. वंध्यत्वाचे योग्यवेळी व अचूक निदान झाल्यास त्यावर औषधोपचार करणे शक्य आहे. औषधोपचाराद्वारे पशुधनामधील वंध्यत्व निवारण करणे या प्रकल्पास दि. १९.१२.२०१४ रोजी नागपूर येथे पार पडलेल्या १९ व्या राज्यस्तरीय प्रकल्प मंजुरी समितीच्या बैठकीमध्ये मंजूरी प्रदान करण्यात आलेली आहे. सदर प्रकल्प राबविण्यासाठी खालीलप्रमाणे शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

**शासन निर्णय:-**

राष्ट्रीय कृषि विकास योजनेमध्ये महाराष्ट्र पशु व मत्स्य विज्ञान विद्यापीठ अंतर्गत क्रांतिसिंह नाना पाटील पशुवैद्यकीय महाविद्यालय, शिरवळ, जि. सातारा येथे पशुधनामधील वंध्यत्व निर्माण करणाऱ्या आजारांचे औषधोपचाराद्वारे व्यवस्थापन व प्रतिबंध करणे या प्रकल्पास याद्वारे प्रशासकीय मंजूरी प्रदान करण्यात येत आहे. तसेच, सदर प्रकल्पांतर्गत रु. १३२.०० लक्ष एवढया खर्चास वित्तीय मंजूरी देखील प्रदान करण्यात येत आहे. सदरचा प्रकल्प सन २०१४-१५ ते २०१६-१७ या कालावधीत राज्यस्तरीय प्रकल्प मंजुरी समितीने मंजूरी प्रदान केल्यानुसार व उपलब्ध होणाऱ्या निधीच्या अधिन राहून राबविण्यात यावा.

**प्रकल्पाचे आर्थिक निकष :-**

या प्रकल्पांतर्गत मंजूर केलेल्या निधीचा विहित शासकीय कार्यप्रणालीचा अवलंब करून खालील बाबींवर खर्च करण्यात यावा.

**(रू. लाखात)**

| अ.क्र. | बाब | अपेक्षित खर्च |
|---|---|---|
| १. | रोग निदान प्रयोगशाळेचे नुतनीकरण (एकुण दोन प्रयोगशाळा) | २०.०० |
| २. | उपकरणे खरेदी-<br>(रेफ्रिजरेटर युनिट, आयसोलेशन स्टोरेज युनिट, बायोसेफ्टी कॅबिनेट, हाय एन्ड फ्लोरेसंट मायक्रोस्कोप)<br>संगणकीय माहिती संकलन (Software for data base) | ४०.०० |
| ३. | रोग निदानासाठी आवश्यक साहित्य<br>(रोगनिदान किटस्, काचेची उपकरणे इतर साहित्य) | ४०.०० |
| ४. | प्रशिक्षण कार्यक्रम<br>(निवास व भोजन व्यवस्था, प्रशिक्षण साहित्य, दृकश्राव्य प्रणाली, लॅपटॉप, प्रिंटर, इंटरॲक्टीव्ह बोर्ड, LCD प्रोजेक्टर, प्रशिक्षणार्थीसाठी निदान किटस्, डेस्कटॉप (संगणक), प्रशिक्षण माहिती पुस्तिका, आवश्यक अनुषंगिक साहित्य) | २०.०० |
| ५. | इतर अत्यावश्यक बाबींवरील खर्च | १०.०० |
| ६. | एकुण (१ ते ५) | १३०.०० |
| ७. | प्रशासकीय खर्च (१ %) | १.३० |
| | **एकुण (६ ते ७)** | **१३२.००** |

**राज्यस्तरीय प्रकल्प मंजुरी समितीने उपरोक्त बाबनिहाय खर्चास मान्यता प्रदान केलेली असल्याने, बाबनिहाय खर्चात कोणताही बदल करण्यात येवू नये. तसेच, कोणत्याही परिस्थितीमध्ये राज्यस्तरीय प्रकल्प मंजुरी समितीने मंजुर केलेल्या निधीपेक्षा जास्त निधी या प्रकल्पासाठी उपलब्ध होणार नाही.**

**प्रशिक्षणार्थींची निवड :-**

या प्रकल्पांतर्गत पशुसंवर्धन विभागातील सर्व जिल्ह्यातील एकूण १०० प्रशिक्षणार्थींची निवड ३ वर्षाच्या कालावधीत संबंधित जिल्ह्यांचे जिल्हा पशुसंवर्धन उपायुक्त यांच्यामार्फत आयुक्त पशुसंवर्धन, यांनी करून प्रशिक्षणार्थींची नावे संबंधितांना कळविण्यात यावे. प्रशिक्षणार्थी यांची निवड करताना ५ वर्षे किमान शासन सेवा झालेले व सेवा निवृत्तीस १० वर्ष कालावधी शिल्लक असलेल्या सहाय्यक आयुक्त पशुसंवर्धन आणि पशुधन विकास अधिकारी (पदवीधर) या संवर्गातूनच प्रशिक्षणार्थींची निवड करण्यात यावी. पशुप्रजननशास्त्रात पदव्युत्तर पदवी प्राप्त अधिकारी उपलब्ध असल्यास त्यांना प्राधान्य देण्यात यावे.

सदरच्या प्रकल्पाची अपेक्षित फलनिश्पत्ती होण्यासाठी हा कार्यक्रम क्षेत्रिय स्तरावर प्रभावीपणे राबविणे आवश्यक आहे. सदरचा प्रकल्प महाराष्ट्र पशु व मत्स्य विज्ञान विद्यापीठ, नागपूर यांच्या अधिनस्त क्रांतिसिंह नाना पाटील पशुवैद्यक महाविद्यालय, शिरवळ, जि. सातारा येथील पशु-प्रजननशास्त्र विभागामार्फत राबविण्यात यावा. सहयोगी अधिष्ठाता, क्रांतिसिंह नाना पाटील पशुवैद्यकीय महाविद्यालय, शिरवळ, जि. सातारा हे या प्रकल्पाचे अंमलबजावणी अधिकारी राहतील. तर, संशोधन संचालक, महाराष्ट्र पशु व मत्स्यविज्ञान विद्यापीठ, नागपूर हे या प्रकल्पाचे सनियंत्रण अधिकारी राहतील.

सदरच्या प्रकल्पास संशोधन संचालक, महाराष्ट्र पशु व मस्त्य विज्ञान विद्यापीठ, नागपुर यांनी तांत्रिक मंजुरी द्यावी.

हा प्रकल्प राबवून झाल्यानंतर क्रांतसिंह नाना पाटील पशुवैद्यकीय महाविद्यालय शिरवळ, जि. सातरा यांनी एकूण ५,००० प्रजनना संबंधी तपासणी करण्यात आलेल्या पशुधनाची संगणकीय संकलित माहिती त्यांच्या अभिप्रायासह आयुक्त पशुसंवर्धन, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचेकडे सादर करावी व आयुक्त पशुसंवर्धन यांनी सदरची माहिती त्यांच्या अभिप्रायासह शासनास सादर करावा.

या प्रकल्पांतर्गत उपलब्ध झालेला निधी व त्याचा विनियोग याबाबतचा हिशोब स्वतंत्रपणे विहित लेखापध्दतीनुसार ठेवण्यात यावा. तसेच, मंजूर व उपलब्ध करून देण्यात आलेला निधी विहित कालमर्यादेत १००% खर्ची करून, त्याबाबतचे विहित प्रपत्रातील उपयोगिता प्रमाणपत्र आयुक्त पशुसंवर्धन यांनी शासनास सादर करावे.

**राष्ट्रीय कृषि विकास योजनेसंदर्भातील केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सुचनेनुसार, सदरचा प्रकल्प कालावधी संपुष्टात आल्यानंतर, पशुधनामधील वंध्यत्व निर्माण करणाऱ्या आजारांचे औषधोपचाराद्वारे व्यवस्थापन व प्रतिबंध करणे हे प्रशिक्षण केंद्र स्वतःच्या पायावर (Self-Sustainable) उभे राहील याची व्यवस्था करावी.**

सदरचा प्रकल्प राज्यस्तरीय प्रकल्प मंजूरी समितीच्या दि.१९.१२.२०१४ रोजीच्या बैठकीतील निर्णय व राष्ट्रीय कृषि विकास योजनेच्या मार्गदर्शक सूचना विचारात घेवून राबविण्यात यावा.

या प्रकल्पाचा समावेश संबंधित जिल्ह्याच्या जिल्हा कृषि आराखड्यात (C-DAP) करण्यात येवून तसे, राष्ट्रीय कृषि विकास योजना कक्ष यांना तसेच, या कार्यासनास कळविण्यात यावे.

केंद्र शासनाने विकसीत केलेल्या RDMIS या प्रणालीवर या प्रकल्पाची माहिती भरण्यात यावी. तसेच, प्रकल्पाच्या आर्थिक खर्चाचा आणि भौतिक साध्याचा मासिक प्रगती अहवाल नियमितपणे शासनास सादर करावा.

प्रकल्प राबविताना त्याची अंमलबजावणी, सनियंत्रण आणि मुल्यमापन करणे याबाबत आवश्यक तो समन्वय अंमलबजावणी यंत्रणांनी आयुक्त कृषि, महाराष्ट्र राज्य, पुणे यांच्याशी ठेवावा.

या प्रकल्पाच्या यशस्वी अंमलबजावणीकरिता आवश्यक त्या मार्गदर्शक सूचना संचालक संशोधन, महाराष्ट्र पशु व मत्स्य विज्ञान विद्यापीठ, नागपुर यांनी त्यांच्या स्तरावरून निर्गमित कराव्यात.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०३१११७०८१६६३०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Machindra Apparao Pachpinde

Digitally signed by Machindra Apparao Pachpinde
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Under Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=a6acbdcfb816875075a31b7754a1ac8c55c206e2845f9145cd34b586d977a703, cn=Machindra Apparao Pachpinde
Date: 2015.03.11 17:22:25 +05'30'

**(डॉ. एम. ए. पाचपिंडे)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. अपर मुख्य सचिव, (कृषि व पणन), कृषि व पदुम विभाग मंत्रालय, मुंबई-३२.
२. आयुक्त पशुसंवर्धन, महाराष्ट्र राज्य, पुणे (५ प्रती).
३. आयुक्त कृषि, महाराष्ट्र राज्य, पुणे.
४. कुलसचिव, महाराष्ट्र पशु व मत्स्यविज्ञान विद्यापीठ, नागपूर.
५. उपसचिव (राष्ट्रीय कृषि विकास योजना कक्ष), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई- ३२.
६. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षण), मुंबई/नागपूर.
७. संचालक संशोधन, महाराष्ट्र पशु व मत्स्य विज्ञान विद्यापीठ, नागपुर.
८. प्रादेशिक सहआयुक्त पशुसंवर्धन (सर्व).
९. सहयोगी अधिष्ठाता, क्रांतिसिंह नाना पाटील पशुवैद्यकीय महाविद्यालय, शिरवळ, जि. सातारा.
१०. जिल्हा पशुसंवर्धन उपआयुक्त (सर्व).
११. जिल्हा पशुसंवर्धन अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व).
१२. कक्ष अधिकारी, राष्ट्रीय कृषि विकास योजना कक्ष, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
१३. अवर सचिव, पदुम-३/कक्ष अधिकारी पदुम-१/१६, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
१४. निवड नस्ती पदुम-४.